Quality Council of India यांच्यामार्फत राज्यातील शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्थांचे Accreditation करुन घेण्यासाठी निधीची तरतूद करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन
## उच्च व तंत्र शिक्षण विभाग
## शासन शुध्दीपत्रक क्रमांकः आयटीआय-२०१४/प्र.क्र. ९०/व्यशि-३

मंत्रालय विस्तार भवन, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २९ एप्रिल, २०१५

**वाचा :**

१. उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शासन निर्णय क्र. आयटीआय-२०१४/प्र.क्र.९०/ व्यशि-३, दि. ०३/०७/२०१४
२. उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शासन निर्णय क्र. आयटीआय-२०१४/प्र.क्र.९०/ व्यशि-३, दि. २७/०१/२०१५
३. प्र. संचालक (प्रशिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, मुंबई यांचे अर्धशासकीय पत्र क्रमांक. डिव्हीईटी/QCI/प्र.क्र.०८/का.२०,दि. २४/०२/२०१५.

**शासन शुध्दीपत्रक :**

राज्यातील ४१७ शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्थापैकी PPP (Public Private Partnership) या योजनेंतर्गत समाविष्ट असलेल्या संस्थाना तसेच समाविष्ट नसलेल्या औद्योगिक प्रशिक्षण संस्थाना QCI ची अधिस्विकृती मिळविण्यासाठी आवश्यक असलेले शुल्क भरण्यास अनुक्रमे संदर्भीय १ व २ येथील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आलेली आहे. या दोन्ही शासन निर्णयातील अट क्र. १ "QCI ची अधिस्विकृती मिळविण्यासाठी आवश्यक शुल्क भरल्यानंतर संबंधित संस्थेची QCI व्दारे तपासणी करण्यात येणार आहे. तथापि, सदर तपासणी वेळी जर संबंधित संस्थेने सर्व बाबींची आवश्यक ती पुर्तता न केल्याने त्या संस्थेची पुन्हा तपासणी करणे गरजेचे ठरल्यास प्रथम पुनर्तपासणीसाठी रू. २०,०००/- आणि व्दितीय व त्या पुढील पुनर्तपासणीसाठी रू. ३०,०००/- एवढे शुल्क आकारण्यांत येणार आहे. अशा प्रकारे एखादया संस्थेने आवश्यक बाबींची पुर्तता न करताच QCI कडे अर्ज केल्यामुळे सदर संस्थेची पुनर्तपासणी करावी लागली तर सदर पुनर्तपासणीच्या शुल्काची रक्कम संबंधित विभागाचे सहसंचालक, संबंधित जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण

अधिकारी आणि संबंधित प्राचार्य यांच्या वैयक्तीक वेतनातून समप्रमाणात वसूल करण्यात येईल.” **या ऐवजी** “QCI ची अधिस्विकृती मिळविण्यासाठी आवश्यक शुल्क भरल्यानंतर संबंधित संस्थेची QCI व्दारे तपासणी करण्यात येणार आहे. तथापि, सदर तपासणी वेळी जर संबंधित संस्थेने सर्व बाबींची आवश्यक ती पुर्तता न केल्याने त्या संस्थेची पुन्हा तपासणी करणे गरजेचे ठरल्यास प्रथम पुनर्तपासणीसाठी रू. २०,०००/- आणि व्दितीय व त्या पुढील पुनर्तपासणीसाठी रू. ३०,०००/- एवढे शुल्क आकारण्यात येणार आहे. त्यामुळे संचालक (प्रशिक्षण) यांनी तपासणी सूची तयार करून त्याप्रमाणे प्रस्ताव QCI ची अधिस्विकृती मिळविण्यासाठी सादर करण्याची संपूर्ण जबाबदारी संचालक (प्रशिक्षण) यांची राहील.” अशी सुधारणा करून वाचावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०४३०११०६५४१५०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rajaram Gobaraji Jadhav

Digitally signed by Rajaram Gobaraji Jadhav
DN: CN = Rajaram Gobaraji Jadhav, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Joint Secretary
Date: 2015.05.20 16:52:18 +05'30'

**(रा. गो. जाधव)**
सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. संचालक (प्रशिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. सहसंचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, प्रादेशिक कार्यालय, मुंबई/पुणे/नाशिक/औरंगाबाद/अमरावती/नागपूर. (संचालनालयामार्फत)
३. महालेखापाल (लेखापरीक्षा) महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
५. संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी, (संचालनालयामार्फत)
६. सर्व जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी, (संचालनालयामार्फत)
७. संबंधित प्राचार्य, शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्था, (संचालनालयामार्फत)
८. निवड नस्ती (व्यशि-३), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मुंबई.